अमरावती जिल्ह्यातील अमरावती तालुक्यातील अस्तित्वातील प्रमुख जिल्हा मार्ग क्र.७४ मध्ये लांबी समाविष्ट करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.५४ /नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ११ मे, २०२३.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचे पत्र जा.क्रमांक/का २(२/ दर्जोन्नती-अम/२०२३/७८५, दिनांक १६/०२/२०२३.
२) शहर अभियंता, महानगरपालिका अमरावती,यांचे पत्र क्र.अमनपा/बां.वि./श.अ./१५१/२२, दिनांक १६/०६/२०२२

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांनी संदर्भाधिन पत्रान्वये अमरावती जिल्ह्यातील अमरावती तालुक्यातील खालील ग्रामीण मार्ग रस्ते लांबी व महानगरपालिका, अमरावती यांच्या अखत्यारितील बडनेरा बसस्थानक ते दुर्गापुर (हनुमान मंदिर) मनपा हद्दिपर्यंतचा रस्त्यांची लांबी अस्तित्वातील प्रमुख जिल्हा मार्ग क्र. ७४ मध्ये समाविष्ट करण्याबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच प्रशासक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती यांनी सदर लांबी अस्तित्वातील प्रजिमा-७४ मध्ये समाविष्ट करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्यांचा होणारा वापर तसेच प्रशासक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती यांची मागणी विचारात घेता, सदर ग्रामीण मार्ग रस्त्यांची लांबी व महानगरपालिका हद्दीतील लांबी प्रमुख जिल्हा मार्ग क्र. ७४ मध्ये समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती यांचा प्रस्ताव व प्रशासक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती यांची मागणी विचारात घेऊन अमरावती जिल्ह्यातील अमरावती तालुक्यातील खालील महानगरपालिका, अमरावती हद्दीतील लांबी व ग्रामीण मार्ग रस्त्यांची लांबी अस्तित्वातील प्रमुख जिल्हा मार्ग क्र.७४ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहेत.

| **अ. क्र.** | **प्रस्तावित रस्त्याचे नांव** | **सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक** | **साखळी क्रमांक व लांबी** | **दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.)** | **दर्जोन्नती नंतरचा क्रमांक** |
|---|---|---|---|---|---|
| १. | बडनेरा रेस्ट हाऊस ते बडनेरा बसस्थानक ते दुर्गापुर (हनुमान मंदिर) राष्ट्रीय महामार्ग क्र.६ ते पाळा-कहिलोलपूर-काटआमला-पिंपरी यादगीरे-चांदुरी ते अमरावती शहर बाहेरील वर्तुळाकार वळण रस्ता (पश्चिम बायपास) राज्यमार्ग क्र.२९९ ला जोडणारा रस्ता. **(अस्तित्वातील प्रमुख जिल्हा मार्ग क्र.७४ मध्ये लांबी समाविष्ट करणे.)** | महानगरपालिका अमरावती यांचे अखत्यारीतील लांबी | (०/०० ते ३/३५०) ३.३५० कि.मी. | १०.३५० कि.मी. | अस्तित्वातील प्रमुख जिल्हा मार्ग क्रमांक -७४ मध्ये लांबी समाविष्ट समाविष्ट केल्यास - प्रजिमा -७४ ची मुळ लांबी १.०० कि.मी. + समाष्टि लांबी १०.३५० = ११.३५० इतकी होईल. |
| | | ग्रामीण मार्ग-७९ | (०/०० ते ५/००) ५.०० कि.मी. | | |
| | | ग्रामीण मार्ग-७० | (०/०० ते २/००) २.०० कि.मी. | | |
| | **एकूण** | | | **१०.३५० कि.मी.** | |

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील अमरावती जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **१०.३५० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (२०६७.८६० + १०.३५० ) म्हणजेच **२०७८.२१० मी.** इतकी व ग्रामीण मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत ७.०० कि. मी. ने घट होवून एकूण लांबी (६३४३.३९० - ७.००) म्हणजेच **६३३६.३९० कि.मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०५१५१५२३३५६८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.05.15 15:24:20 +05'30'

**( ग. सं. कचरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, अमरावती. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, अमरावती. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत :-**

१) उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन,मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई .

२) जिल्हाधिकारी, अमरावती

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती.

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, अमरावती.

५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

६) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

७) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

८) निवडनस्ती.